शिक्षक प्रशिक्षण या केंद्रपुरस्कृत योजनेंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील (दुसरा हप्ता) केंद्र व राज्य शासनाच्या सर्वसाधारण लेखाशीर्षातून निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अनुवि- ४३१६/(८३/१६)/प्रशिक्षण**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२,
तारीख: २४ मार्च, २०१७

वाचा -

**मनुष्यबळ व विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.एफ ४४-३०/२०१६-ईई-९, दिनांक ०६.०३.२०१७.**

प्रस्तावना -

केंद्र शासनाने सन २०१६-१७ पासून शिक्षक प्रशिक्षण (TEAB) या केंद्र पुरस्कृत योजनेचा केंद्र व राज्य हिश्याचे प्रमाण ६०:४० असे निश्चित केले आहे. त्यानुसार केंद्र शासनाने सदर योजनेच्या अनुषंगाने सर्वसाधारण (General Head) या लेखाशीर्षातंर्गत दि.०६/०३/२०१७ च्या पत्रान्वये दुसरा हप्ता उपलब्ध करून दिला आहे. त्यानुसार सदर योजनेमध्ये उणे प्राधिकार उपलब्ध असल्याने, वेतनावर उणे खर्च झाल्याचे दिसून येते. त्याअनुषंगाने शिक्षक प्रशिक्षण या केंद्र पुरस्कृत योजनेकरिता सर्वसाधारण (General Head) या लेखाशीर्षातून सन-२०१६-१७ करिता केंद शासनाने उपलब्ध करुन दिलेला दुसऱ्या हप्त्याच्या निधीमधून वेतनावरील झालेला उणे खर्च समायोजित करुन उर्वरित निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

शिक्षक प्रशिक्षण या केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत सर्वसाधारण (General Head) लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाने दुसरा हप्ता (६०%) रु.४४२.१७४ लाख वितरित केलेला आहे. केंद्र हिश्याच्या प्रमाणात राज्य हिस्सा (४०%) रु.२९४.७८३ लाख असा एकूण रु.७३६.९५७ इतका आहे. तथापि, केंद्र हिश्यामधून रु.३९४.०४ लाख व राज्य हिश्यामधून रु.२६२.०३ लाख असा एकूण रु.६५५.०७ लाख इतका निधी उणे प्राधिकारान्वये वेतनावर झालेला उणेखर्च समायोजित करुन उर्वरित निधी खालील तक्त्यामध्ये दर्शविल्यानुसार वितरीत करण्यात येत आहे. (रुपये लाखात)

| दुसरा हप्ता | केंद्र शासनाच्या पत्राच दिनांक | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | एकूण रुपये | उणे प्राधिकारान्वये वेतनावरील उणे खर्च- केंद्र/राज्य (समायोजित करावयाचा निधी) | वितरीत करावयाचा निधी (कॉलम ५-६) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| General Head | दि.०६/०३/२०१७ | ४४२.१७४ | २९४.७८३ | ७३६.९५७ | ६५५.०७ | ८१.८८७ |

केंद्र शासनाने दि.०६/०३/२०१७ च्या पत्रान्वये वितरीत केलेल्या रु.४४२.१७४ लाख व त्याप्रमाणात राज्य हिस्सा रु.२९४.७८३ लाख असा एकूण रु.७३६.९५७ लाख इतक्या निधी मधून उणे प्राधिकारान्वये वेतनावर झालेला एकूण रु.६५५.०७ उणे खर्च समायोजित करुन उर्वरित रु.८१.८८७ लाख (रुपये ऐक्याऐंशी लाख अठ्ठयाऐंशी हजार सातशे फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर खर्च "मागणी क्र.ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८० सर्वसाधारण, ००३-प्रशिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०१)(०३) शिक्षकांचे प्रशिक्षण (केंद्र पुरस्कृत योजना)(केंद्र हिस्सा) (२२०२३०२९) या लेखाशीर्षातून सन-२०१६-१७ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदीतून करण्यात यावा

व मागणी क्र.ई-२,२२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८०, सर्वसाधारण, ००३-प्रशिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०१)(०४) शिक्षकांचे प्रशिक्षण (केंद्र पुरस्कृत योजना)(राज्य हिस्सा) (२२०२३७८२)" या लेखाशीर्षातून सन-२०१६-१७ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदीतून करण्यात यावा. तसेच, ज्या उद्दिष्टांसाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच उद्दिष्टांसाठी खर्च करण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.क्र.१४५/अर्थोपाय, दि.२२/३/२०१७ व दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकामधील अटी व शर्तींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२४१२५७२५७५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Baban Ranganath Mali

Digitally signed by Baban Ranganath Mali
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=058a3365edca1bab7b5a512fa9b602a739d12b55819b89fd7154a7a28ccbaa1e, serialNumber=d2974b67a90018e618d5e11ffd00382f063542cc3d866753cfd5a4ad652b1908, cn=Baban Ranganath Mali
Date: 2017.03.24 12:57:37 +05'30'

**( बी.आर.माळी )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र शासन, पुणे
३. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक)महाराष्ट्र राज्य, पुणे
४. संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे
५. संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य पुणे
६. संचालक (प्रौढ व अल्पसंख्याक) महाराष्ट्र राज्य, पुणे
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र (१/२), मुंबई/नागपूर
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर.
१०. सर्व प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. वित्त विभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-८), मंत्रालय, मुंबई.
१४. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. निवडनस्ती.